नवनिर्मित पालघर जिल्ह्यातील निवडणूक कार्यालयासाठी कार्यालय प्रमुख तसेच आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१४/प्र.क्र.९८८/१४/३३
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ९ सप्टेंबर, २०१४

वाचा :-

सा.प्र.वि., शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१४/प्र.क्र.९८८/१४/३३, दिनांक १४ ऑगस्ट, २०१४.

शासन निर्णय :-

नवनिर्मित पालघर जिल्ह्यातील निवडणूक कार्यालयासाठी आवश्यक पदे निर्माण करण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

या शासन निर्णयान्वये शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८,भाग पहिला, उप विभाग-एक, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-२ अंतर्गत प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, पालघर यांना निवडणूक विषयक कामकाजासाठी "कार्यालय प्रमुख" आणि उप जिल्हाधिकारी (निवडणूक) यांना निवडणूक विषयक कामकाजासाठी "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०९१२०५२३०७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LUDBE ATMARAM M

Digitally signed by LUDBE ATMARAM M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=LUDBE ATMARAM M
Date: 2014.09.09 12:00:48 +05'30'

(आ. म. लुडबे)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२) प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३) विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.

४) सर्व विभागीय आयुक्त.

५) सर्व जिल्हाधिकारी.

६) प्रधान महालेखापाल व महाराष्ट्र -१/२, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

७) प्रधान महालेखापाल व महाराष्ट्र -१/२, (लेखा परीक्षा), नागपूर.

८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

१०) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/पालघर.

११) कक्ष अधिकारी, व्यय-४/वित्तीय सुधारणा -१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

१२) उपजिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी, पालघर जिल्हा

१३) निवडनस्ती कार्यासन-३३.